भारता, सुस्थितींतील धर्म निराळा व आपत्कालांतील धर्म निराळा आहे. कोशावांचूनहि धर्माची प्राप्ति होते. तरी धर्माहून चरितार्थ हा मोठा आहे. दुर्बलाला चरितार्थ द्रव्यावांचून चालविणें शक्य नसल्यामुळें त्याला धर्माचें महत्त्व वाटत नाहीं. जेणेंकरून धर्म घडूनहि अंगीं सामर्थ्य येईल असा एकहि उपाय नाहीं, त्याअर्थी संकटकालीं अधर्माला धर्माचें स्वरूप येतें, व धर्म अधर्मरूप होतो, असें विद्वानांचें मत आहे. असें असतां संकटकाळ निघून गेल्यावर क्षत्रियानें—राजानें—काय करावें! तर जेणेंकरून धर्माला ग्लानि येणार नाहीं व ज्याच्या योगानें त्याला शत्रूच्या स्वाधीन व्हावें लागणार नाहीं असें कांहींतरी साधन त्यानें संपादावें. आपला स्वतःचा नाश त्यानें करून घेऊं नये. संकटकालीं आपल्या किंवा परकीयांच्या धर्माचा लोप होण्याचा प्रसंग आला असतां सर्व उपायांनीं त्या संकटांतून आपली मुक्तता करून घ्यावी.

युधिष्ठिरा, धर्माचरण हेंच सर्व धर्मवेत्त्यांचें मुख्य तत्त्व असून बाहुवीर्य धारण करून उद्योग करणें हें क्षत्रियांचें मुख्य कर्तव्य होय, असें वेदवचन आहे. हे भारता, त्याच्या वृत्तीच्या आड ही गोष्ट येत असल्यास ब्राह्मण किंवा तपस्वी यांच्या द्रव्याशिवाय दुसऱ्या कोणाचेंहि द्रव्य घेण्याचा त्याला अधिकार आहे. ज्याप्रमाणें ब्राह्मण आपत्कालांत आला असतां कोणाच्या येथेंहि यज्ञ करण्यास व अभक्ष्याचेंहि भक्षण करण्यास त्याला मोकळीक आहे, तशीच क्षत्रियाचीहि गोष्ट आहे. पीडित मनुष्याला दुर्मार्ग असा कोणताच नाहीं. कोंडून ठेविलेला मनुष्य वाट सांपडेल त्या क्षुद्र द्वारानेंहि पळून जातो. ज्याचें कोशबल क्षीण झालें आहे व जो सर्वांकडून पराजित झाला आहे, त्याला भिक्षा मागून किंवा वैश्य-शूद्रांप्रमाणें कोणताहि धंदा किंवा सेवाहि करतां येत नाहीं, तर कोणावरहि आपला भार न टाकितां त्याला स्वधर्मोचित पराक्रमानें जय मिळविणें अथवा आपल्या व परराष्ट्राकडून बलात्कारानें द्रव्य काढणें हेंच उचित होय. यांपैकीं पहिला मार्ग जरी त्याला श्रेयस्कर असला तरी आपत्कालीं दुसऱ्याहि मार्गाचें त्यानें अवलंबन केल्यास हरकत नाहीं. आपत्कालीं अन्यायमार्गानेंहि उपजीविका करणें हें धर्मलक्षणच होय. चरितार्थाच्या साधनाचा क्षय झाला असतां ब्राह्मणाला सुद्धां अधर्माचरणानें राहतां येतें. मग क्षत्रियानें अशाप्रकारचें वर्तन केल्यास हरकत कोणती? राजानें आपत्प्रसंगीं राष्ट्रांतील प्रमुख लोकांकडून द्रव्य संपादन करावें. त्यावांचून आपला नाश कधींहि करून घेऊं नये.

राजा हा प्रजेचा नाश करणारा व तसाच संरक्षणकर्ताहि आहे; म्हणून संरक्षणकर्त्या राजानें प्रजेपासून द्रव्य घ्यावें. हे राजा, दुसऱ्याला पीडा दिल्यावांचून या जगांत कोणाचीहि वृत्ति चालणें शक्य नाहीं. अरण्यांत राहणारा व एकटाच संचार करणारा मुनि जरी असला, तरी त्याचीहि उपजीविका दुसऱ्याला पीडा दिल्याशिवाय होणार नाहीं. केवळ दैवावर विश्वास ठेवून राहिल्यास तसेंहि राहतां येणें शक्य नाहीं. विशेषेंकरून प्रजापालन करूं इच्छिणाऱ्या राजाला तर तसें राहणें अगदीं अशक्य आहे. आपत्कालीं राजा आणि राष्ट्र यांनीं परस्परांचें रक्षण केलें पाहिजे, हा सनातन धर्म आहे. ज्याप्रमाणें राष्ट्रावर संकट आलें असतां राजा लागेल तें द्रव्य खर्चून राष्ट्राचें संरक्षण करितो, त्याप्रमाणें राष्ट्रानेंहि संकटकालीं राजाचें रक्षण करावें. कोश, शासनपद्धति, सैन्य, मित्र आणि दुसरेंहि जें कांहीं त्यानें संचय करून ठेविलें असेल, त्या सर्वांचें त्यानें रक्षण करावें. राजा क्षुधापीडित झाला म्हणून त्यानें राष्ट्राला दूर न सारितां त्याचें पोषण करावें. अन्न देऊन त्याचें बीज घ्यावें, असें धर्मवेत्त्यांचें म्हणणें आहे. बीजाचें रक्षण न केल्यास पुढें जसें अन्नाचें दौर्बल्य होतें, त्याचप्रमाणें अल्पधन राजाचें प्रजेनें रक्षण न केल्यास त्याचा व त्याबरोबर प्रजेचाहि नाश होतो. मायाशास्त्रज्ञ जो शंबरासुर त्याचें म्हणणें असें आहे कीं ज्याचें राष्ट्र लयाला जात आहे, तसेंच ज्याच्या राष्ट्रांत उपजीविकासाधन न मिळाल्यामुळें मनुष्याला परदेशाला जावें लागतें, त्या राजाचा धिक्कार असो.

राजाचा आधार म्हणजे कोश आणि सैन्य हा होय. त्याचप्रमाणें सैन्यास कोश हा आधार आहे. सैन्य हें सर्व धर्माला आधार असून धर्म हा प्रजेला आधार आहे. दुसऱ्याला पीडा दिल्यावांचून कोश संपादन करणें अशक्य आहे, मग सैन्य तरी कोठून संपादन करितां येणार ? म्हणून कोशसंचयासाठीं दुसऱ्याला पीडा द्यावी लागली, तर तो दोषास्पद होत नाहीं. यज्ञकर्मामध्यें यज्ञासाठीं अकार्य गोष्टीहि कराव्या लागतात, त्याचप्रमाणें प्रजापालन करितांना प्रजेपासून द्रव्य संचय करणारा राजा दोषास्पद होत नाहीं. द्रव्यासाठीं योजलेल्या उपायांपैकीं एखाद्यानें द्रव्यप्राप्ति होते, एखाद्यानें होत नाहीं, तर एखाद्यानें अनर्थप्राप्ति होत असते. तरी ते सर्व द्रव्यप्राप्तीचेच उपाय होत. हें जाणून शहाण्या मनुष्यानें आपला कर्तव्यनिश्चय ठरवावा. यज्ञासाठीं ज्याप्रमाणें पश्वादिक साधनें लागतात, चित्तसंस्कारार्थ यज्ञ लागतो आणि पश्वादिक यज्ञ

चित्तशुद्धि हीं मोक्षासाठीं लागतात, त्याप्रमाणें दंड हा कोशाकरितां, कोश सैन्याकरितां आणि सैन्य हें शत्रुपराभवाकरितां होय.

ह्यासंबंधी धर्मतत्त्व व्यक्त करून दाखविणारा एक दृष्टांत सांगतों. यज्ञासाठीं यूप तोडीत असतात. तो तोडतांना त्याला प्रतिबंध करणारे वृक्षहि तोडावे लागतात व ते वृक्ष पडत असतांना त्यांबरोबर लहानसहान झुडपांचाहि नाश होतो. अशा रीतीनें मोठा कोशसंचय करण्याचे कामीं जे लोक अडथळा आणीत असतात, त्यांचा वध केल्याशिवाय इष्टार्थसिद्धि होणें शक्य नाहीं. द्रव्याच्याच योगानें इह-परलोक साध्य होतात, हें धर्मवचन सत्य आहे. म्हणून द्रव्यहीन मनुष्य असून नसल्यासारखाच होय. यासाठीं सर्व उपायांनीं आधीं राजानें यज्ञाकरितां धनसंचय केला पाहिजे. हे भारता, अशा आपत्प्रसंगीं कार्य तें अकार्य आणि अकार्य तें कार्य होऊन दोष लागत नाहीं. हे राजा, द्रव्यसंग्रह आणि द्रव्यत्याग ह्या दोनी गोष्टी एके ठिकाणीं संभवणें कधींहि शक्य नाहीं. अरण्यांत जाऊन राहिलेले मोठे धनसमृद्ध झाल्याचें माझ्या पाहण्यांत नाहीं. ह्या पृथ्वीवर जेवढें म्हणून द्रव्य दिसत आहे, 'तें सर्व मला मिळावें, तें सर्व मला मिळावें,' म्हणून सर्व लोक इच्छा करीत असतात. हे परंतपा, राज्यासारखा दुसरा कोणताहि धर्म नाहीं. संकटकाळीं राजांचा धर्म याहून दुसरा आहे. कित्येक लोक दानानें, कित्येक आपल्या कर्मानें, कित्येक तपस्वी तपाच्या योगानें, कित्येक बुद्धीनें तर कित्येक आपल्या अंगच्या दक्षतेनें द्रव्यसंचय करितात. द्रव्यहीन मनुष्याला दुर्बल म्हणतात, धनाच्या योगानें पुरुष बलवान् होतो. धनवानाला सर्व प्राप्त होतें. 'कोशवान् मनुष्याला सर्व संकटांतून तरून जातां येतें.' कोशाच्या योगानें मनुष्याला धर्म आणि काम, तसेंच इहलोक व परलोक यांची प्राप्ति होते. तो कोश धर्माच्याच योगानें मिळविण्याची आकांक्षा धरावी. अधर्मानें संपादन करण्याची इच्छा कधींहि करूं नये. १२. १. १३०.

येथें पहिलें राजधर्मपर्व समाप्त झालें.

---